एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी)-८ मधील परिविक्षाधीन गट विकास अधिकारी, गट-अ यांना २९ आठवड्यांच्या गट विकास अधिकारी, गट-अ या पदाच्या स्वतंत्र कार्यभाराकरिता देण्यात आलेल्या पदस्थापनेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** मविसे-१०२२/प्र.क्र.१५७/२०२२/आस्था-३ अ
३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २२ जुलै, २०२४

**वाचा :**

**शासन निर्णय, ग्राम विकास विभाग समक्रमांकः** दिनांक १९ जानेवारी, २०२४.

**शासन निर्णय :**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-८ अंतर्गत, महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ मधील परिविक्षाधीन गट विकास अधिकारी, गट-अ यांना उपरोक्त वाचा मधील दिनांक १९ जानेवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, गट विकास अधिकारी, गट-अ पदाच्या स्वतंत्र कार्यभार प्रशिक्षणासाठी पंचायत समित्यांचे वाटप करण्यात आले आहेत. त्यानुसार श्री.शुभम सु. जाधव, परिविक्षाधीन गट विकास अधिकारी, गट-अ यांची पदस्थापना गट विकास अधिकारी, पंचायत समिती, गोरेगाव, जिल्हा गोंदिया येथे करण्यात आली होती.

०२. उपरोक्त वाचा मधील ग्राम विकास विभागाच्या दिनांक १९ जानेवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये गट विकास अधिकारी, गट-अ पदाच्या स्वतंत्र कार्यभार प्रशिक्षणासाठी दिलेल्या पदस्थापनेच्या अनुषंगाने प्रशासकीय कारणास्तव अंशत: बदल करून **परिशिष्ट-अ** मध्ये नमूद केल्याप्रमाणे श्री.शुभम सु. जाधव यांना गट विकास अधिकारी, गट-अ पदाच्या स्वतंत्र कार्यभार प्रशिक्षणासाठी पंचायत समितीचे सुधारित वाटप करण्यात येत आहे.

०३. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-८ मधील संबंधित परिविक्षाधीन अधिकारी यांना सुधारित स्वतंत्र कार्यभाराच्या पदावर रूजू होण्यासाठी त्वरीत कार्यमुक्त करावे. तसेच सर्व संबंधित परिविक्षाधीन अधिकारी यांनी परिशिष्ट-अ मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर तात्काळ हजर होऊन स्वतंत्र कार्यभार मिळालेल्या पदाचा रूजू अहवाल संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२२१६४९४०७६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2024.07.22 18:33:15 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (ग्रा.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर विभाग.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया.
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
७. संचालक, वनामती, धरमपेठ अमरावती रोड, नागपूर.
८. अवर सचिव (आस्था-३), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. संबंधित परिविक्षाधीन अधिकारी (संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत).
१०. निवड नस्ती (कार्यासन आस्था-३ अ), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.

**शासन निर्णय क्रमांक मविसे-१०२२/प्र.क्र.१५७/२०२२/आस्था-३ अ, दिनांक २२ जुलै, २०२४ सोबतचे सहपत्र**

**परिशिष्ट- अ**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-८

गट विकास अधिकारी, गट-अ या पदाचा **सुधारित** स्वतंत्र कार्यभार

| अ. क्र. | परिविक्षाधीन अधिकाऱ्याचे नाव | स्व-महसुल विभाग | स्व-जिल्हा | स्वतंत्र कार्यभार पदस्थापनेसाठी देण्यात आलेली पूर्वीची पंचायत समिती | स्वतंत्र कार्यभार पदस्थापनेसाठी देण्यात येणारी सुधारित पंचायत समिती |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.शुभम सु. जाधव | पुणे | सांगली | ग.वि.अ., पंचायत समिती, गोरेगाव, जिल्हा गोंदिया | ग.वि.अ., पंचायत समिती, देवरी, जिल्हा गोंदिया |